**नळ पाणी पुरवठा योजनांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्र.ग्रापाधो-२०२०/प्र.क्र.२१/पापु-०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई.
दिनांक: ३० जुलै २०२०.

वाचा:-

१) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४/पापु-०७, दि. ०१ ऑगस्ट, २००९.
२) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दि. १७ मार्च, २०१०
३) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दि. ३० ऑगस्ट, २०१०.
४) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१२१३/प्र.क्र.३५/पापु-०७, दि. १६ जुलै, २०१३.
५) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दि. ०९ जुलै, २०१४.
६) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दि. १७ ऑक्टोबर, २०१४.
७) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दि. १६ फेब्रुवारी, २०१४.
८) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दि. १व मार्च, २०१५.
९) शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पाप्र-०७, दि. १५ जून, २०१५.
१०) शासन निर्णय क्र.मुपेयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दि. २५ जानेवारी, २०१७.
११) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-२०१७/प्र.क्र.५३/पापु-०७, दि. ०९ मार्च, २०१८.
१२) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-२०१८/प्र.क्र.१७१/पापु-०७, दि. ११ फेब्रुवारी, २०१९.

**शासन परिपत्रक:**

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी राज्य शासनाने मागणी आधारित लोकसहभागाचे लोकाभिमुख धोरण स्वीकारले आहे. सन २००९-१० पासून या कार्यक्रमाचे रुपांतर राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (National Rural Drinking Water Programme-NRDWP) असे करण्यात आले आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार राज्यातील ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत सुधारणा करण्यासाठी ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमासाठी मार्गदर्शक सुचना वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत दरडोई खर्चाच्या निकषात बसणाऱ्या स्वतंत्र पाणी पुरवठा योजनांसाठी या विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १७ मार्च २०१०, ३० ऑगस्ट, २०१० व दिनांक १६ जुलै, २०१३ च्या शासन निर्णय/शुध्दीपत्रकान्वये ग्रामसभेस रु. ५०.०० लक्षपर्यंतचे व स्वतंत्र/प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांसाठी जिल्हा व्यवस्थापन समितीस रु. ५.०० कोटीपर्यंतचे प्रशासकीय मान्यतेचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. तथापि, प्रशासकीय मान्यता देतांना स्थानिक स्वराज्य संस्थांकडे (प्रामुख्याने ग्रामपंचायतीकडे) पुरेसे मनुष्यबळ अथवा तांत्रिक/ प्रशासकीय क्षमता नसल्यामुळे बऱ्याच पाणी पुरवठा योजनांची योग्य प्रकारे छाननी न होता, त्यांना मान्यता दिली जात असल्याचे तसेच जिल्हा स्तरावर योजनांच्या प्रशासकीय मान्यतेस विलंब होत असल्याने नळ पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय मान्यता, निविदा स्वीकृती, तांत्रिक मान्यता, अंमलबजावणीचे अधिकार तसेच सुधारीत प्रशासकीय मान्यतेबाबतच्या प्रस्तावामध्ये सुसुत्रता आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**०३. त्या अनुषंगाने नळ पाणी पुरवठा योजनांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याच्या प्रस्तावाबाबत पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत:-**

१) मूळ मंजूर योजनेतील एकूण उपांगातील तांत्रिक बदलामुळे मुळ मंजूर योजनेची किंमत वाढणार असल्यास त्यास शासनाची पूर्व मान्यता घेणे अनिवार्य आहे. तसे न केल्यास संबंधीतावर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

२) मूळ मंजूर योजनेत काही कारणास्तव तांत्रिक बदल करणे आवश्यक असल्यास मुळ मंजूर किंमतीच्या अधीन राहून तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम असणाऱ्या अधिकाऱ्यांची पूर्व परवानगी घेऊनच बदल करण्यात यावेत.

३) पाणी पुरवठा दरडोई ५५ LPCD निकषाप्रमाणे वैयक्तिक/घरगुती नळ जोडण्याद्वारे पाणी पुरवठा करणे शक्य होईल याची तपासणी करावी.

४) IMIS प्रणालीनुसार सध्याची एकुण घरांची संख्या किती? यापैकी किती घरांना नळ जोडणी आहे? उर्वरीत घरांना नळ जोडणी देण्याचे नियोजन काय? हे सर्व योजनेत समाविष्ट करावे. या विषयी ग्रामपंचायतचा ठराव घ्यावा.

५) प्रशासकीय मान्यता मिळाल्यापासून २ वर्षाच्या कालावधीत निविदा काढाव्यात यापेक्षा जास्त काळ निविदा करता येऊ न शकल्यास योजनेची नवीन प्रचलित किंमतीनुसार किंमत काढून त्यास मान्यता घ्यावी व नंतर निविदा काढण्यात याव्यात.

६) जादा दरांच्या निविदांची पूर्व परवानगी न घेता कार्योत्तर मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करण्यात येतात तथापि, याबाबत योजनेची किंमत १५% पेक्षा जादा येण्याची शक्यता नाकारता येत नाही. या अनुषंगाने कार्योत्तर मान्यता ही केवळ काही विशिष्ट परिस्थितीत देता येणार नाही. तरी, जादा दराच्या निविदेस मान्यता प्राप्त झाल्याशिवाय कार्यादेश देण्यात येऊ नये. याची संपुर्ण जबाबदारी कार्यकारी अभियंता यांची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

०४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र २०२००७२७१७०२००७०२८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.08.03 16:14:37 +05'30'

**( वसंत माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
६. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
७. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
८. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१०. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
११. निवडनस्ती (कार्यासन-पापु-०७)